**श्री. राजन अरविंद कोप, संचालक, नगर रचना, पुणे यांना दि.०१ जुलै, २०१५ रोजी देय असलेली वार्षिक वेतनवाढ मंजूर (Release) करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. वेतन-१५१५/१५०४/प्र.क्र.२६२/नवि-२७,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :-०३ ऑक्टोबर, २०१५.

वाचा :- १. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.डीआरडब्ल्यू. १३८१/प्र.क्र.३६५/८९/कोषागार-४, दि.१८ ऑक्टोबर, १९८९.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.सीएफआर १२११/प्र.क्र.२१७/तेरा, दि.१७ डिसेंबर, २०११.

३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०१३/प्र.क्र.५५/कोषा प्र-५, दि.०९.०७.२०१३.

४. आपले पत्र क्र.आस्था/राअको/वा.वे./लेखा/४९३७, दि.०४.०८.२०१५.

प्रस्तावना :-

वित्त विभागाच्या **संदर्भ-१** येथील दि.१८.१०.१९८९ च्या शासन निर्णयान्वये राजत्रित अधिकाऱ्यांच्या वेतन आहरण करण्याच्या पद्धतीत सुधारणा करण्यात आली असनू सदरहू शासन निर्णयासोबतच्या जोडपत्रातील तरतुदीनुसार विभाग प्रमुख व अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांच्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करण्याचे अधिकार संबंधीत प्रशासकीय “विभाग प्रमुख” यांना प्राधिकृत करण्यात आले आहेत.

**०२.** सामान्य प्रशासन विभागाच्या **संदर्भ-२** येथील दि.१७.१२.२०११ च्या शासन निर्णयान्वये अखिल भारतीय सेवेतील व राज्य शासकीय सेवेतील अधिकाऱ्यांचे / कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवालांचे प्रतिवेदन व पुनर्विलोकनासाठी कॅम्प आयोजित करण्याबाबत आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत. त्यानुसार प्रतिवेदन व पुनर्विलोकनाचे २ कॅम्प आयोजित केल्यानंतर देखील जे प्रतिवेदन अधिकारी / पुनर्विलोकन अधिकारी त्यांच्याकडील गोपनीय अहवालाचे प्रतिवेदन / पुनर्विलोकनाचे काम पूर्ण करणार नाहीत, अशा अधिकाऱ्यांना दरवर्षी दिनांक ०१ जूलै रोजी देय होणारी वार्षिक वेतनवाढ असे काम पूर्ण करण्याच्या दिनांकापर्यंत मंजूर (Release) करु नये. अशा प्रतिवेदन / पुनर्विलोकन अधिकाऱ्यांनी त्यांच्याकडील प्रतिवेदन / पुनर्विलोकनाचे काम पूर्ण केल्यानंतर त्यांना त्यांची दिनांक ०१ जुलैची वेतनवाढ पूर्वलक्षी प्रभावाने देय राहील, अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

**०३.** नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाने **संदर्भ-४** येथील त्यांच्या दि.०४.०८.२०१५ च्या पत्रान्वये श्री.राजन अरविंद कोप, संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना दि.०१ जुलै, २०१५ रोजी देय असलेली वार्षिक वेतनवाढ मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव विभागाच्या मंजूरीस्तव सादर केलेला आहे.

**०४.** सबब, श्री. रा. अ. कोप, संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना दि.०१ जुलै, २०१५ रोजी देय असलेली वार्षिक वेतनवाढ मंजूर करण्याबाबतची बाब विभागाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. राजन अरविंद कोप, संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी मुख्य कार्यालय व संचालनालयाच्या आस्थापनेवरील सर्व संबंधित अधिकाऱ्यांच्या सन २०१४-१५ च्या गोपनीय अहवालाच्या प्रतिवेदनाचे व पुनर्विलोकनाचे काम पूर्ण केल्याचे तसेच त्यांनी वेतनवाढीला बाधा होणार नाही, अशी रजा घेतली नसल्याचे संचालनालयाने प्रमाणित केले आहे.

**०२.** वित्त विभागाच्या **संदर्भ-१** व सामान्य प्रशासन विभागाच्या **संदर्भ-२** येथील शासन निर्णयातील तरतुदी व मार्गदर्शक सूचना विचारात घेता श्री. राजन अरविंद कोप, संचालक, नगर रचना यांना दि.०१.०७.२०१५ रोजी देय असलेली वार्षिक वेतनवाढ पुढीलप्रमाणे मंजूर करण्यास या ज्ञापनाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| a. पदाचे नांव | :- संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| b. वेतनसंरचना व ग्रेड वेतन | :- पीबी-४, रु.३७,४००-रु.६७,०००+ग्रेड वेतन रु.८,९००. |
| c. सध्याचे वेतन | :- रु.५२,९८०+ग्रेड वेतन रु.८,९००. |
| d. मागील वेतन वाढीचा दिनांक | :- दि.०१.०७.२०१४. |
| e. वेतनवाढीचा दर | :- रु.१,८६०. |
| f. वेतनवाढीनंतरचे वेतन | :- रु.५४,८४०+ग्रेड पे रु.८,९००. (दि.०१.०७.२०१५ रोजी) |

**०३.** श्री. रा. अ. कोप, संचालक, नगर रचना यांना वरीलप्रमाणे वेतनवाढ मंजूर करण्यात येत असल्याने वेतनवाढ मंजूरीच्या परिणामी त्यांना दि.०१.०७.२०१५ पासून अनुज्ञेय वेतन व भत्ते तसेच फरकाची रक्कम अदा करण्यात यावी.

**०४.** श्री. रा. अ. कोप, संचालक, नगर रचना यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली आहरित व संवितरीत करण्यात येतात, या बाबीवरील खर्च देखील त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येऊन **सन २०१५-१६** करिता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**०५.** श्री. रा. अ. कोप, संचालक, नगर रचना यांच्या सेवापुस्तकात सदरहू वेतनवाढ मंजूरीची आवश्यक ती नोंद घेण्यात यावी.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक संकेताक २०१५१००३१५५२२६३८२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=26293749901b04ac59c3d853c2fdc32df6083d811902b3e94b40b924fa028887, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2015.10.03 17:32:50 +05'30'

( दि. सि. अणेराव )

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, नागपूर.
३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(३-प्रती)**
४. श्री. राजन अरविंद कोप, संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती / नवि-२७.

*****